महा-कॅम्पा प्राधिकरणास सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यानुसार कामे करण्यास मंजूरी देणेबाबत.

# महाराष्ट्र शासन

## महसूल व वन विभाग,

शासन निर्णय क्रमांक : एफएलडी-२०२१/प्र.क्र.१००/फ-१०

हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,

दिनांक : १२.१०.२०२१

वाचा :-

१. राष्ट्रीय प्राधिकरण, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. NA-१५/१८/२०२०-NA, दि.०२.०७.२०२१

२. राष्ट्रीय प्राधिकरण, पर्यावरण, वन व जलवायु परिवर्तन मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र. NA-१५/१८/२०२०-NA, दि.३१.०८.२०२१

३. शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफएलडी-२०२०/प्र.क्र.१०२/फ-१०, दि.१४.०९.२०२१

४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-कॅम्पा/प्र.क्र.११-२/२०२०-२१/३१९, दि.०६.०९.२०२१.

५. शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१

प्रस्तावना :-

सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात महा-कॅम्पा प्राधिकरणासाठी रू.६५० कोटी इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे. चालू आर्थिक वर्षात रू.६८८.२७ कोटी रकमेच्या वार्षिक नियोजन आराखड्यास मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखालील सुकाणू समितीने दि.१९.०५.२०२१ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. तसेच राष्ट्रीय प्राधिकरणाने दि.०२.०७.२०२१ रोजीच्या पत्रान्वये रू.१०६.६६ कोटी व दि.३१.०८.२०२१ रोजीच्या पत्रान्वये रू.४८१.६१ कोटी असे एकूण **रू.५८८.२७ कोटी** इतक्या रकमेच्या कामांना मंजूरी दिली आहे.

वित्त विभागाने चालू आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पित रकमेपैकी रू.१६२.५ कोटी इतकी रक्कम BEAMS प्रणालीवर महा-कॅम्पा प्राधिकरणास वितरित करण्यात आली आहे. याव्यतिरिक्त सन २०२०-२१ या आर्थिक वर्षात वितरित करण्यात आलेली रू.३८.०१ कोटी इतकी अखर्चित रक्कम महा-कॅम्पा प्राधिकरणाकडे शिल्लक होती. सदर रक्कम महा-कॅम्पा प्राधिकरणाची सुकाणू समिती, राष्ट्रीय प्राधिकरण आणि वित्त विभाग यांनी दिलेल्या मान्यतेनुसार सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात खर्च करण्यास शासन निर्णय दि.१४.०९.२०२१ अन्वये मंजूरी दिली आहे. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर

उपलब्ध निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत खर्च करण्यास परवानगी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला रू.१६२.५ कोटी इतका निधी महा-कॅम्पा **सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत** खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आहे.

२. पर्यायी वनीकरणाअंतर्गत चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला **रु.२६.२५ कोटी** इतका निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत, महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक - सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०१) पर्यायी वनीकरण (५०- इतर खर्च), **(2406A541)** या लेखाशीर्षाखाली खर्च करण्यात यावा.

३. पाणलोट क्षेत्र उपचार योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला **रू.४.२५ कोटी** इतका निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत, महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक - सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०२) पाणलोट क्षेत्र उपचार योजना (५०- इतर खर्च), **(2406A677)** या लेखाशीर्षाखाली खर्च करण्यात यावा.

४. एकात्मिक वन्यजीव व्यवस्थापन योजनेंतर्गत चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला **रू.०.२५ कोटी** इतका निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत, महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक-सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०३) एकात्मिक वन्यजीव व्यवस्थापन (५०- इतर खर्च), **(2406A686)** या लेखाशीर्षाखाली खर्च करण्यात यावा.

५. नक्त वर्तमान मूल्यांतर्गत चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला **रू.११८.३८७५ कोटी** इतका निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत, महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक :- सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०४) वनजमिनीचे नक्त वर्तमान मूल्य (५० - इतर खर्च), **(2406A695)** या लेखाशीर्षाखाली खर्च करण्यात यावा.

६. व्याज अंतर्गत चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला **रू.९.४२५० कोटी** इतका निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत, महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक :- सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०५) व्याज (५०-इतर खर्च), **(2406A701)** या लेखाशीर्षाखाली खर्च करण्यात यावा.

७. इतर अंतर्गत चालू आर्थिक वर्षात वितरित केलेला **रू.३.९३७५ कोटी** इतका निधी सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यातील तरतूदीच्या कमाल मर्यादेत, महसूल व वन विभाग, मागणी क्रमांक :- सी-७, प्रधान लेखाशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, उप प्रधान लेखाशीर्ष ०४- वनीकरण व परिस्थितीकीय विकास, गौणशीर्ष-१०३- राज्य पर्यायी वनीकरण, गटशीर्ष-०१, राज्य प्राधिकरण, (०१) (०६) इतर (५०-इतर खर्च), **(2406A712)** या लेखाशीर्षाखाली खर्च करण्यात यावा.

८. सन २०२१-२२ च्या मंजूर वार्षिक नियोजन आराखड्यामध्ये मंजूर बाबींव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही, कामाची द्विरुक्ती होणार नाही याची दक्षता घ्यावी तसेच खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी. सदर वितरित केलेल्या निधीच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र सादर केले जाईल याची दक्षता घ्यावी.

९. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०१२१६५६२३५२१९ असा आहे. हा निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

Arvind Shankar Apte

Digitally signed by Arvind Shankar Apte
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c0a68ee850c7ae56e3bbf1e252bef5c7e2ba3631df8eadfdcd47cdd3c33b91a1, cn=Arvind Shankar Apte
Date: 2021.10.12 16:58:42 +05'30'

**(अरविंद आपटे)**
**मुख्य वनसंरक्षक (मंत्रालय)**

**प्रति :-**

१) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक व मुख्य कार्यकारी अधिकारी (महा-कॅम्पा), नागपूर
३) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास) महाराष्ट्र राज्य, नागपूर
४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), १/२ महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
५) सह सचिव, अर्थोपाय / व्यय-१० / अर्थ-६, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
६) कार्यासन, ब-१, महसूल व वन विभाग,मंत्रालय, मुंबई
७) निवडनस्ती.